# क्रमांक२ :शिवशक

महाराष्ट्रांतील दुसरा शक म्हणजे 'शिवशक' ज्ञानदेवांच्या वेळीं महाराष्ट्राची राजधानी जी देवगिरी, तेथे यादववंशीय रामदेवराय हे राजे होते. ''तेथ यदुवंशविलासु। सकळ कळा निवासु। न्यायातें पोशी क्षितीशु। श्रीरामचंद्रु।।'' असे ज्ञानदेवांनी ज्ञानेश्वरीच्या समाप्तीच्या वेळीं म्हटले आहे.

नंतरच्या काळासंबंधी मोठे नवल आणि आश्चर्य वाटते कीं, इसवीसन १२९० नंतर कांहीं पाच-सातशें वर्षांचा काळ लोटला नाही; अवघ्या ३०० वर्षांच्या गुलामगिरीचा इतका वाईट परिणाम झाला कीं, या महाराष्ट्रांत मराठ्यांचें राज्य असावे हा विचार देखील मराठी मनाला कधी शिवला नाही. मराठे सरदारांच्या जवळ त्यांच्या स्वत:च्या मोठमोठ्या फौजा असूनहि मुसलमानांची चाकरी करण्यांत त्यांनी आयुष्यभर धन्यता मानली. सगळ्यांत आश्चर्य असे कीं, ब्राह्मणवर्गाच्या बुद्धीचा व्यामोह पहा!

'सांप्रत भारतवर्षांत क्षत्रियच उरला नाही.' अशी हाकाटी पिटण्यास त्यांनी सुरूवात केली. केवढा दैवदुर्विलास हा! शिवजन्मापर्यन्त महाराष्ट्राची ही अशी मानसिक अवस्था होती.

मराठवाड्याच्या पूर्वभागांत निजामशाही, विजापूरपासून कोल्हापूरपर्यन्त आणि मध्य महाराष्ट्रांत विजापूरची आदिलशाही, दक्षिणेकडे गोवळकोंड्याची कुतुबशाही, दिल्लीपासून अहमदनगरपर्यन्त महाभयंकर मोगलसत्ता. या सगळ्या भयानक अजगराच्या विळख्यांत, 'आ' वासून बसलेल्या या मगरी-सुसरींच्या जबड्यांत अडकलेल्या या मराठी समाजाला आपल्या अस्तित्त्वासाठीं उठून उभे राहण्याचें सामर्थ्यच उरले नव्हतें. अशा पार्श्वभूमीवर स्वराज्याची प्रतिष्ठापना ही अद्वितीय क्रान्तिकारी घटना आहे. हा अनाकलनीय ट्रान्सफरसीन झाला. सारा मनूच पालटला. नूतन संवत्सर अवतरलें. जणूं रामचंद्रांनीच पुन्हा अवतार घेतला. त्यांच्या भोंवती पुन्हा अयोध्यावासीय गोळा झाले. वानर सेना सिद्ध झाली आणि परवशतेच्या काळ्याकुट्ट अंधाऱ्या रात्रींत स्वामीनिष्ठेचें आणि नैतिकतेच्या

परिसीमेचें हें सत्ययुग कसे काय अवतरले! विचार करूं जातां खरोखर मती गुंग होते.

''परित्राणाय साधूनां विनाशाय च दुष्कृताम्
धर्मसंस्थापनार्थाय संभवामि युगे युगे''

प्रबळ आक्रमकांना नामोहरम करून आपले सिव्हासन निर्माण करण्याची पात्रता आपल्यांत आहे हे महाराजांनी आपल्या कर्तृत्वाने सिद्ध केले आणि जगाच्याहि प्रत्ययास आणून दिले.

तब्बल तीस वर्षें महाराजांनी आणि त्यांच्या अनुयायांनी आपल्या अतुलनीय पराक्रमानें, असीम त्यागानें, अचाट उद्योगानें, उत्तुंग महत्वाकांक्षेनें, अनाकलनीय साहसानें, {ही गोष्ट पन्हाळगडाच्या वेढ्याच्या वेळीं दिसून आली.} मुसलमानी सत्तेची पाळेमुळे खणून काढली. त्यांचा दम उखडला. संपूर्ण हिंदुस्थान आपल्या सत्तेखाली आणून त्याला इस्लामी करायचे अशी स्वप्नें पाहणारे अल्लाचे हे उन्मत्त शासक, त्यांची स्वप्नें महाराजांनी पार धुळीला मिळविली. अशी स्वप्नें पाहण्याची त्यांची हिंमतच खचली.

कारण मराठी सत्तेचा उदय होऊन हा चंडांशु, आतां आपल्या पूर्ण तेजानें तळपूं लागला होता.

सरित्पतीचें जळ मोजवेना ।
मध्यान्हींचा भास्कर साहवेना ।
मुठींत वैश्वानर माववेना ।
तैसा शिवाजी नृप जिंकवेना ।।

अशी महाराजांची अजेय प्रतिमा निर्माण झाली होती. ‘महाराज धर्मस्थापनेसाठीं स्वराज्य निर्माण करीत आहेत. ते प्राचीन राजांच्या मालिकेंत शोभतील असे पुण्यश्लोक आहेत’ अशी त्यांची कीर्ति दिगंत पसरली.

कासीकी कला जाती ।
मथुरा मस्जित बन जाती ।
अगर शिवाजी न होते ।
तों सुन्नत होत सबकी ।।

यमुनातीर निवासी कवि भूषणाचें हें वक्तव्य, अगदी अक्षरश: खरे आहे. तशी वस्तुस्थितीच होती. यांत काडीमात्रहि अतिशयोक्ति नाही.

या भूमंडळाचें ठायीं । तुम्हांऐसा होणे नाही।
महाराष्ट्रधर्म राहिला काही । तुम्हांकरिता ।।

तुमच्यामुळें हा महाराष्ट्रधर्म शिल्लक राहिला, टिकून राहिला, जिवंत राहिला, नाहींतर त्याची वाट लागली असती; असे स्वत: समर्थांनी म्हणावे यावरून त्यावेळची परिस्थिती ध्यानीं येते.

आतां महाराजांना राज्याभिषेक करण्याचे निश्चित झाले. कित्येक शतकें मराठ्यांना राज्य नव्हतें, सिव्हासन नव्हतें, सिव्हासनाधिष्ठित राजा नव्हता. मात्र आतां महाराष्ट्राच्या जीवनांत कपिलाषष्ठीचा असा हा अपूर्व योग आला. मराठी मनें आनंदाने वेडी झालीं. आनंदाश्रूंनी त्यांचे नेत्र वाहूं लागले.

पूर्वी कधी न देखलें, पाहिलेलें असें राज्य व असा राजा, हा महाराष्ट्रांतच नव्हे, तर अखिल हिंदुस्थानांत चमत्काराचा विषय झाला.यवनाक्रान्त अखिल हिंदुस्थानांत महाराष्ट्र हें एकमेव राज्य, सर्वत्र महाबलाढ्य यावनी सत्ता अस्तित्वांत असतां निर्माण झाले; ही ‘न भूतो न भविष्यति’

अशी घटना घडली. ही घटनाच इतकी विलक्षण आहे कीं, कुठल्या शब्दांत तिचें मूल्यमापन करावे तें समजत नाहीं. हजारो वर्षांत झाला नाहीं असा इतिहास घडविणाऱ्या या महान युगपुरूषाची अनाकलनीय योग्यता वर्णन करण्यास प्रत्यक्ष सरस्वतीहि मुकी होईल.

राज्याभिषेकाची तयारी सुरूं झाली. तख्तास जागा रायगड. राजसभा सिद्ध झाली. सुवर्ण सिव्हासनास ३२ मण सोनें लागलें. त्यावर अमोलिक रत्नें जडविण्यांत आलीं. मुहूर्त ठरला ज्येष्ठ शुद्ध १३ त्रयोदशी, शके १५९६, इसवी सन १६७४, शनिवार, सूर्योदयापूर्वी तीन घटिका उष:काली. भारतवर्षांतील सप्त नद्या व समुद्रोदकें, सर्व तीर्थोदकें यांनी महाराजांना राज्याभिषेक झाला. कोटी कोटी कण्ठांतून एकच निनाद उठला—“ हिंदवी स्वराज्य संस्थापक, गो ब्राह्मण प्रतिपालक ‘छत्रपती श्री शिवाजी महाराज!!! ” छत्रपतींची राजमुद्रा सार्थ झाली.

प्रतिपद् चंद्र-रेखेव वर्धिष्णुर्विश्ववंदिता ।।
शाहसूनो: शिवस्यैषा मुद्रा भद्राय राजते।।

अष्टप्रधान आले. संस्कृत नांवे आली. राज्य-व्यवहारकोश सिद्ध झाला. स्वराज्य आलें. महाराजांच्या अपार वैभवानें पाहणारांचे डोळे निवले. मनें तृप्त झालीं. जिजाबाई साहेबांना धन्यता वाटली. त्यांच्या बाळ शिवबाचें स्वप्न साकार झालें. जयजयकार दुमदुमला. हा समारंभ म्हणजे वैभवाचें प्रदर्शन नव्हतें तर पराभूत मनोवृत्तीनें ग्रासलेल्या हिंदूजातीला संजीवनी देणारी ही घटना होती.

तीनशें वर्षांच्या आजपावेतोंच्या प्रत्येक काल-खण्डांत ही घटना महाराष्ट्रालाच नव्हें, तर अखिल भरतखंडाला प्रेरणा देणारी ठरली आहे.

धर्म संस्थापनेचे नर। ते हे ईश्वराचे अवतार।
झाले आहेत पुढे होणार। देणें ईश्वराचें।।

विनाशायच दुष्कृतां धर्मसंस्थापनार्थाय ।
संभवामि युगे युगे ।।

किंबहुना तुमचे केले। धर्मकीर्तन हें सिद्धी
गेले।

महाराष्ट्रांत शिवछत्रपती आणि ज्ञानदेव यांचें ‘‘झाले बहु, आहेत बहु, होतीलहि बहु परी यांचेसम हेच’’ असें अनन्यसाधारण स्थान आहें. महाराष्ट्र उणे शिवराय = ० आणि मराठी भाषा उणे ज्ञानेश्वरी = ० अशी आजघडीलाहि स्थिती आहे.

महाराज सिव्हासनाधिष्ठित झाल्यापासून शिवशक सुरूं होतो. याला तीनशें एकोणतीस वर्षे झाली. या वर्षीं शिवशक ३३० आहे.

हा खरा महाराष्ट्राचाच नव्हें, तर भारताचा स्वातंत्र्यदिन आहे. आज दिल्ली आणि भारताला महाराजांच्या या महनीय उपकाराची जाणीव नाही. दिल्लीमध्यें संसदभवनासमोर त्यांचा अश्वारूढ पुतळा उभारण्यासंबंधीं कांहीं काळ फार खळ-खळ आणि आढेवेढे घेणें चालूं होतें. आणि तेथे हे आपलेच लोक, महारथी अतिरथी बसलेलें होते. त्यांचें म्हणणें असें कीं, शिवाजी हें अखिल भारतीय नेतृत्व नव्हतें; तर तो एका चवाळभर प्रदेशाचा राजा होता. त्यांच्या कृतघ्न-पणाची आणि बेइमानीची ही हद्द झाली.

तुकाराम महाराजांच्या भाषेंत, यांचा जन्म झाला त्यावेळीं ''काय माय गेली होती भुतापाशीं''असे म्हणावे वाटतें.

यांना एक गोष्ट कळत नाही कीं,शिवछत्रपती झाले नसते आणि सर्व हिंदू समाज इस्लाम झाला असतां तर लाल किल्ल्यावर तिरंगा फडकावयास यांचें अस्तित्व तरी शिल्लक राहिले असतें काय?

सिंधमध्यें महंमद बिन कासीम प्रथम आला. जाळपोळ, कत्तल आणि भयानक लूट करून निघून गेला. तेव्हांपासून हा देश जवळजवळ १ हजार वर्षें यवनाक्रान्त राहिला. ती १ हजार वर्षांच्या गुलामगिरीची काळीकुट्ट अंधारी रात्र संपून शिवछत्रपतींच्या वेळीं स्वराज्याचा अरूणोदय झाला, स्वातंत्र्य सूर्याची किरणें प्रथम या देशावर पडलीं; याचा यांना विसर पडतो आणि केवळ दीडशें वर्षांची ब्रिटिशांची गुलामगिरी, त्यांतून मुक्त झाल्याबद्दल हे महाभाग ऊर बडवून आम्ही स्वतंत्र झालो म्हणून सांगतात. अशी मूर्ख आणि बदफैली माणसं या देशांत निर्माण होतील तर या देशाचे कधीहि

भले होणार नाही हें निश्चित समजावे. स्वातंत्र्य मिळून ५५ वर्षें झाली, अजूनहि हे लोक १५ ऑगस्ट आणि २६ जानेवारी साजरें करताहेत. शिवछत्रपती, तुमच्या या ५५ वर्षांतच आपल्या अफाट कर्तृत्वानें महाराष्ट्रांत सुवर्णयुग निर्मून निघूनहि गेले. मात्र हे लोक केवळ स्वातंत्र्यदिन साजरे करताहेत यावरून हे किती अपात्र, निकामी आणि नालायक आहेत हें उघड दिसतें. आम्ही गुलाम होतो आतां स्वतंत्र झालो आहोत असे हे लोक ५५ वर्षें झाली, कंठरवानें सांगत आहेत; ही गोष्ट सूर्य-चंद्र असेपर्यन्त सांगणार काय? कोठेतरी थांबणार आहांत कीं नाही? बाळ्या लहानपणीं गोट्या खेळत होता. ते आतां ५५वर्षांचे बाळासाहेब झाल्यावरहि पूर्वीचाच उद्योग अत्यंत निष्ठेनें करीत असतील तर त्यांच्यापुढे ब्रह्मदेवाचीहि अक्कल बंद होईल का राहील? हें एरंडाचें गुऱ्हाळ आहे. आमचें एवढेच सांगणें आहे कीं, त्यांना काय करायचे तें करोत, झक मारोत; आम्ही त्यांत सहभागी होऊं शकत नाही हें निश्चित. स्वातंत्र्यदिन ही गुलामीची निशाणी आहे, स्वतंत्रतेचें प्रतीक नाही. शिवाजी महाराजांना १६७४ सालीं राज्याभिषेक झाला आणि १६८० सालीं ते कालवश झाले. त्यांना

निदान ५ वर्षें तरी यवनांच्या गुलामगिरींतून मुक्त झाल्याबद्दल स्वातंत्र्यदिन साजरा करता आला असता. पण त्यावेळीं असे कोणाच्याहि मनांत आले नाही. कारण मराठा शरीराने मुसलमानांचा गुलाम होता. मनाने कधीच नव्हता. आज आम्ही केवळ शरिरानें स्वतंत्र झालो आहोत. आमची मन-बुद्धि पूर्णपणें भ्रष्ट झाली आहे. ही गुलामीची निशाणी आहे. यामुळेंच स्वातंत्र्य दिनासारख्या घाणेरड्या सवयी आणि हलकट लक्षणें भारतीय समाजाची नियती झाली आहे.

रायगडावर महाराजांना राज्याभिषेक झाल्यावर स्वत: औरंगजेबाने ‘येथे इस्लामचें राज्य होण्याचे अल्लाच्याच मनांत नाही.’ असे म्हणून आणि खाली जमिनीवर बसून व दोन्ही हात घासून आपला शोक प्रकट केला. औरंगजेबासारख्या परधर्मीय कट्टर शत्रूला ज्या घटनेचें व ज्या व्यक्तीचें मूल्य समजलें ते आपलेच धर्मबांधव असलेल्या दिल्लींतील महाभागांना कळेना. केवढे दुर्दैव आमचें ! केवढी अपात्रता आणि नालायकी ! एकेकाळीं साम्राज्याधिष्ठित असलेल्या दिल्लीश्वरानें (म्हणजे नेहरूंनी) ‘वाट

चुकलेला देशभक्त’ म्हणून महाराजांची संभावना केली होती. आणि रायगडावर आल्यावर ‘कलरफुल हीरो’ असले छचोर वक्तव्य करून इंदिरा गांधींनी महाराजांची अनाठायीं स्तुती केली होती. इंग्रज, पोर्तुगीज, फ्रेंच, मोगल यांना महाराजांचें मोल कळले. मात्र आपलेच ज्ञातीबांधव हा मूर्खपणाचा कळस करताहेत. भारतांतील फार मोठा वर्ग बुद्धिमान नाही, बुद्दू आहे आणि नीच मनोवृत्तीचा हलकट आहे. भारतासारख्या पुण्य-भूमध्यें हे सूर्याजी पिसाळ आहेत, हे अस्तनींतील निखारे आहेत आणि यांचेच बहुमत वाढत चालले आहे. ख्रिश्चन अथवा इस्लाम धर्मांत जन्मून असे वक्तव्य केले असते तर थोबाडे फाडून टाकली असती तुमची. अगदी ताजे उदाहरण, ‘सॅटानिक व्हर्सेस’ चा लेखक सलमान रश्दीचें आहे. सगळी मुसलमान राष्ट्रें त्याच्या जिवावर उठली होती. आणि हा तमाशा सगळ्या जगाने पाहिला. आपले लोक घरच्या म्हातारीचे काळ आहेत.

इंग्लंडचा पंतप्रधान विन्स्टन चर्चिल १९४७ सालीं म्हणाला होता कीं, स्वातंत्र्य देण्यास

हिंदुस्थानचे लोक अपात्र आहेत. त्यांना ते फार काळ टिकविता येणार नाही.

प्रचंड सामर्थ्य आणि अमाप वैभव असलेली पेशवाई कां गेली? आणि शिवछत्रपतींचा चवाळभर मुलूख त्यांच्या पश्चातहि कित्येक वर्षें भयानक संकटांना तोंड देत कसा टिकून राहिला? यासाठीं आम्ही इतिहासाचे अतिशय सावधपणें आणि दक्षतेने अवलोकन करण्यास हवे आहे. केवळ शिवशाहीर निर्माण होऊन भागणार नाही. रामशास्त्र्यासारखा कठोर आणि खंबीर इतिहास संशोधकच हवा. ज्याचें नांव काढले असतां उत्तर हिंदुस्थानांत कापरें भरायचें, असा कर्दनकाळ अतुर्बळी औरंगजेब, प्रचंड सेना घेऊन स्वत: जातीने महाराष्ट्रांत आला. स्वत: का आला तर मराठ्यांचें सामर्थ्य एवढे वाढलें होतें कीं, त्याचा बीमोड करण्यासाठीं ज्यावर विश्वास ठेवावा असा एकहि समर्थ सरदार औरंगजेबाच्या नजरेंत येईना. म्हणून तो स्वत:च या मोहिमेवर निघाला आणि तो केव्हां निघाला, तर महाराजांच्या मृत्यूनंतर. तोपर्यन्त त्याची महाराष्ट्रांत यायची हिंमत झाली नाही. या घटनेंत केवढा मोठा अर्थ भरला आहे आणि ती

इतकी बोलकी आहे कीं, आचरटासारख्या बडबडणाऱ्या मूर्खांची थोबाडे बंद व्हावीत.

राजारामानंतर ताराबाईनें मराठ्यांचें नेतृत्व करून अनेक वर्षें औरंगजेबाशी चिवट झुंज दिली. औरंगजेब २७ वर्षें महाराष्ट्रांत होता. ‘‘मराठा तो बडा शैतान है।’’ असे म्हणत औरंगजेबासारख्या महाबलाढ्य शत्रूलाहि जेथें हार मानावी लागली; तो चवाळभर मुलूख हिंदुस्थानचा बाप आहे, हे ध्यानीं घ्या म्हणावे या हरामखोरांना— दिल्लीवाल्यांना.

सदाशिवरावभाऊ पेशव्यांनी दिल्लीचें तख्त घन घालून फोडलें. त्यावर दिल्लीमधील कित्येक हिंदूप्रतिष्ठितांनी आणि पेशव्यांच्याच पदरीं असलेल्या जाट, बुन्देले आणि राजपुतांनी थोबाडे वाकडी करून आपली नाराजी व्यक्त केली. आजघडीलाहि या स्थितींत कांहींहि फरक पडला नाही. गुलामी आणि लाचारी आमच्या रक्तांतच मुरली आहे का काय, कळत नाही!

अपूर्ण

आप्पा ठोंबरे.

मार्गशीर्ष अमावस्या शके १९२५.